सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये राज्यातील पुणे,ठाणे,नागपूर व रत्नागिरी या ४ प्रादेशिक मनोरुग्णालयांसाठी मनोविकारावरील (सायकॅट्रीक) औषधे व इतर बाबींची खरेदी करण्यासाठी लेखाशिर्ष २२१० ०२९१, ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दिष्टाखाली रु.३,११,७३,३८८/- इतक्या खर्चाच्या रकमेस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

## महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
### शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-१२२४/प्र.क्र.८६/आरोग्य-८

१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : १४ फेब्रुवारी २०२५.

वाचा :-

१) अतिरिक्त संचालक,(मानसिक आरोग्य) आरोग्य सेवा,मुंबई यांचे पत्र क्र. आआसे/ माआ/ टे-४/ मनोऔषधे/खरेदी/प्र.मा/१६०५-०९/२४, दिनांक .२१.०५.२०२४
२) अतिरिक्त संचालक,(मानसिक आरोग्य) आरोग्य सेवा,मुंबई यांचे पत्र क्र. आआसे/ माआ/ टे-४/ मनोऔषधे/खरेदी/प्र.मा/२४००-०४/२४, दिनांक .१३.०८.२०२४

प्रस्तावना:-

वाचा मधील अ.क्र.१ व २ येथील अतिरिक्त संचालक,(मानसिक आरोग्य) आरोग्य सेवा,मुंबई यांनी सादर केलेल्या प्रस्तावानुसार, सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये राज्यातील पुणे,ठाणे,नागपूर व रत्नागिरी या ४ प्रादेशिक मनोरुग्णालयांसाठी मनोविकारावरील (सायकॅट्रीक) औषधे व इतर बाबींची खरेदी करण्यासाठी लेखाशिर्ष २२१० ०२९१ अंतर्गत २१- पुरवठा व सामुग्री या उद्दिष्टाखाली रु. ४,६२,००,०००/- इतकी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली आहे. परंतु सदर खरेदी महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरण,मुंबई यांच्यामार्फत करण्यात येणार असून सदर प्राधिकरणासाठी मागणी क्र. आर-१, लेखाशिर्ष २२१० के०८८ (०९)(०२)- महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरणामार्फत औषधी, औषधी साहित्य, यंत्र सामग्री व साधन सामग्री खरेदी (कार्यक्रम), ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर) असे लेखाशिर्ष निर्माण करण्यात आले आहे.

२. सबब वाचा मधील अ.क्र.१ व २ येथील अतिरिक्त संचालक,(मानसिक आरोग्य) आरोग्य सेवा,मुंबई यांनी विनंती केल्याप्रमाणे, सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये राज्यातील पुणे,ठाणे,नागपूर व रत्नागिरी या ४ प्रादेशिक मनोरुग्णालयांसाठी मनोविकारावरील (सायकॅट्रीक) औषधे व इतर बाबींची खरेदी करण्यासाठी लेखाशिर्ष २२१० ०२९१ अंतर्गत २१-पुरवठा व सामुग्री या उद्दिष्टा ऐवजी ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दिष्टाखाली उपलब्ध होणा-या अनुदानातुन रु.३,११,७३,३८८/- इतक्या रकमेच्या खरेदीस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

३. सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये राज्यातील चार प्रादेशिक मनोरुग्णालय पुणे,ठाणे,नागपूर व रत्नागिरी यांना मनोविकारावरील सायकॅट्रीक औषधे व इतर बाबींची खरेदी करण्यासाठी लेखाशिर्ष २२१० ०२९१ अंतर्गत २१-पुरवठा व सामुग्री या उद्दिष्टा ऐवजी ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दिष्टाखाली उपलब्ध होणा-या अनुदानातुन रु.३,११,७३,३८८/- इतक्या रकमेच्या खरेदीस खालील नमूद अटी व शर्तीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यासाठीचा शासन मान्यता देण्यात येत आहे:-

(१) सदरहू सायकॅट्रीक औषधे व इतर बाबींची खरेदीची खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर खरेदीसाठी निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

(२) सदरहू सायकॅट्रीक औषधे व इतर बाबींचे विनिर्देशन गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती / अधिकारी) यांनी मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत. तसेच, सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल, अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात आल्यानंतरच सदरहू साहित्य सामुग्री खरेदी करण्याची दक्षता घ्यावी.

(३) सदर खरेदी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरण, मुंबई यांनी शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित पध्दतीने खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी. सदरची खरेदी प्रशासकीय मंजुरीच्या विहित कालावधीत पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी.

(४) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व / पुरवठानंतर नमुना तपासणी (pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश (specification) असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल तसेच या बाबींच्या खरेदीची द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

(५) सदर खरेदीसाठी येणारा खर्च २२१० ०२९१, ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर)या उदिष्टाखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातुन भागविण्यात यावा.

(६) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अ.क्र.४ नियम क्र.७ समोरील स्तंभ क्र.६ येथील अटींची पूर्तता करण्यात यावी.

(७) तसेच सदर खरेदी झाल्यानंतर खर्चाचे विनियोग प्रमाणपत्र अतिरिक्त संचालक, मानसिक आरोग्य, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांनी शासनास सादर करावे.

४. वर नमूद खरेदीच्या अनुषंगाने अनुदानाचा व प्रशासकीय मान्यतेचा तपशील खालीलप्रमाणे आहे:-

## विवरणपत्र

## अनुदानाचा तपशिल

| अ. क्र | लेखाशिर्ष | खरेदीचा तपशील | सन २०२४-२५ अर्थसंकल्पीय तरतूद | प्रशासकिय मान्यतेची रक्कम |
|---|---|---|---|---|
| १ | २२१० ०२९१<br>बाब-२१- पुरवठा व सामग्री | सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये राज्यातील पुणे,ठाणे,नागपूर व रत्नागिरी या ४ प्रादेशिक मनोरुग्णालयांसाठी मनोविकारावरील (सायकॅट्रीक) औषधे व इतर बाबींची खरेदी करणे | रु.४,६२,००,०००/- | रु. ३,११,७३,३८८/- |
| २ | २२१० ०२९१<br>३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | | रु.१,०००/- | |

५. सदर प्रस्तावानुसार खरेदी करावयाच्या राज्यातील पुणे,ठाणे,नागपूर व रत्नागिरी या ४ प्रादेशिक मनोरुग्णालयांसाठी मनोविकारावरील (सायकॅट्रीक) औषधे व इतर बाबींची यादी सोबतच्या विवरणपत्र-अ मध्ये दर्शविलेली आहे.

६. उपरोक्त परिच्छेद क्र.३ मधील अनुक्रमांक १ ते ७ येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची व खरेदी नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबदारी, आयुक्त,आरोग्य सेवा आयुक्तालय,मुंबई,मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरण, मुंबई, व संबंधित कार्यक्रम प्रमुख अतिरिक्त संचालक,(मानसिक आरोग्य) आरोग्य सेवा,मुंबई यांची राहील.

७. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अनु क्रमांक ४, नियम क्र. ७ अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०२१४१४५५३७८३१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIKAS TULSHIRAM KADAM

Digitally signed by VIKAS TULSHIRAM KADAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=9869ec61c857e78e82b7a19b04c6d22f8ef1b8dbc9b19d45ef776d80ef148059, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=406CB152E109154A7466C0050F88E5A437E17838973824687653A5E8D144B72B, cn=VIKAS TULSHIRAM KADAM
Date: 2025.02.14 14:56:34 +05'30'

(विकास तु. कदम)
अवर सचिव महाराष्ट्र शासन

प्रत:-

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरण, मुंबई

३) अतिरिक्त संचालक,(मानसिक आरोग्य) आरोग्य सेवा,मुंबई
४) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५) सह संचालक, आरोग्य सेवा, (खरेदी कक्ष),आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
६) सह संचालक आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन),आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
७) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई
८) महालेखापाल, महाराष्ट्र-२(लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), नागपूर
९) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१०) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
११) अवर सचिव (अर्थसंकल्प), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) निवडनस्ती (आरोग्य-८)

(शासन निर्णय क्र.प्रशामा-१२२४/प्र.क्र.८६/आरोग्य-८,दि.१४.०२.२०२५ चे सहपत्र)

## विवरणपत्र-अ
## खरेदीचा तपशिल

**4 Regional Mental Hospital**
**Psychiatric Medicine Requirement for 2024-25**

| Sr.No. | Name | Approx. rate per tab/Inj | RMH PUNE | RMH THANE | RMH NAGPUR | RMH RATNAGIRI | Total Demand | Amount |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| 1 | Carbamezapine Tab 200 mg | 1.27 | 130000 | 150000 | 180000 | 100000 | 560000 | 711200 |
| 2 | Clozapine Tab 50 mg | 1.26 | 70000 | 500000 | 440100 | 30000 | 1040100 | 1310526 |
| 3 | Clozapine Tab 100 mg | 5.60 | 0 | 300000 | 0 | 0 | 300000 | 1680000 |
| 4 | Divalproex Sodium Tab 500 mg | 1.61 | 600000 | 950000 | 300000 | 400000 | 2250000 | 3622500 |
| 5 | Haloperidol Deconoate Depot Inj 1 ml | 84.75 | 100 | 3950 | 4900 | 458 | 9408 | 797328 |
| 6 | Lithium Carbonate Tab 300 mg | 1.29 | 160000 | 150000 | 145000 | 75000 | 530000 | 683700 |
| 7 | Lorazepam Tab 2 mg | 1.03 | 220000 | 380000 | 450000 | 20000 | 1070000 | 1102100 |
| 8 | Nitrazepam Tab 5 mg | 4.49 | 0 | 25000 | 50006 | 0 | 75006 | 336777 |
| 9 | Olanzapine Tab 10 mg | 0.31 | 900000 | 750000 | 3500000 | 100000 | 5250000 | 1627500 |
| 10 | Olanzapine Tab 5 mg | 0.15 | 200000 | 1500000 | 500000 | 300000 | 2500000 | 375000 |
| 11 | Sodium Valporate Tab 200 mg | 0.87 | 1100000 | 700000 | 300000 | 800000 | 2900000 | 2523000 |
| 12 | Trifluroperazine + Trihexyphenidyl Tab 5 mg + 2 mg | 0.67 | 750000 | 1300000 | 500000 | 100000 | 2650000 | 1775500 |
| 13 | Inj. Paliperidone Palmitate 100mg | 4775.90 | 0 | 800 | 0 | 200 | 1000 | 4775900 |
| 14 | Inj. Paliperidone Palmitate 150mg | 4775.90 | 900 | 0 | 300 | 30 | 1230 | 5874357 |
| 15 | Tab. Sodium Valporate 500mg | 1.56 | 1100000 | 800000 | 300000 | 350000 | 2550000 | 3978000 |
| | **Total Cost** | | | | | | | **31173388** |